**शासन सेवेत सरळसेवेने नियुक्तीसाठीच्या कमाल वयोमर्यादेत दि.३१ डिसेंबर २०२३ पर्यंत शिथिलता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सनिव २०२३/प्र.क्र.१४/कार्या १२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३ मार्च, २०२३

**संदर्भ :-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.४०४/का-१२, दि.२५.०४.२०१६

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवी वर्षाचे औचित्य साधून राज्य शासनाने ७५ हजार पदभरतीची प्रक्रीया सुरु करण्याचे घोषित केले असून, याकरीता पदभरतीवरील निर्बंध काही कालावधीकरीता शिथिल करण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने भरती प्रक्रीया सुरु झाली आहे. दरम्यानच्या कालावधीत काही लोकप्रतिनिधींकडून निवेदने प्राप्त झाली आहेत. सदर निवेदनांद्वारे अशी मागणी करण्यात आली आहे की, विविध कारणांमुळे (उदा. कोरोना, सदोष मागणीपत्रे व मागणीपत्र न पाठविणे इ.) पुरेशा जाहिराती प्रसिध्द न झाल्याने, ज्या उमेदवारांना परिक्षांना बसण्याची संधी प्राप्त झाली नाही आणि त्यांची कमाल वयोमर्यादा संपुष्टात आली आहे, अशा उमेदवारांना परिक्षांना बसण्याची संधी प्राप्त व्हावी, यास्तव शासनाने कमाल वयोमर्यादेत सवलत देण्याबाबत सकारात्मक निर्णय घ्यावा. या पार्श्वभूमीवर उमेदवारांना कमाल वयोमर्यादेत शिथिलता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

प्रस्तावनेत नमूद कारणांचा साधकबाधक विचार करुन, या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

१) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ते दि.३१ डिसेंबर, २०२३ पर्यंत शासकीय सेवेत सरळसेवेने नियुक्तीसंदर्भात प्रसिद्ध होणाऱ्या सर्व जाहिरातींकरिता अर्ज करणाऱ्या उमेदवारांसाठी संदर्भाधीन दि.२५.०४.२०१६ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेत (खुल्या प्रवर्गासाठी ३८ वर्षे व मागास प्रवर्गासाठी ४३ वर्षे) दोन वर्षे इतकी शिथिलता (खुल्या प्रवर्गासाठी ४० वर्षे व मागास प्रवर्गासाठी ४५ वर्षे) देण्यात येत आहे.

२) ज्या पदांसाठी संबंधित पदांच्या सेवाप्रवेश नियमात विवक्षित कारणास्तव संदर्भाधीन दि.२५.०४.२०१६ मध्ये विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेपेक्षा भिन्न कमाल वयोमर्यादा विहित केली आहे, अशा पदांसाठी देखील या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ते दि.३१ डिसेंबर, २०२३ पर्यंत शासकीय सेवेत सरळसेवेने नियुक्तीसंदर्भात प्रसिध्द होणाऱ्या सर्व जाहिरातींकरिता अर्ज करणाऱ्या उमेदवारांसाठी संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमात विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेत दोन वर्षे इतकी शिथिलता देय राहील.

३) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापूर्वी जाहिराती प्रसिध्द झालेल्या आहेत तथापि अद्याप उमेदवारांनी अर्ज सादर करण्याची मुदत संपलेली नाही, अशा सर्व जाहिरातींसाठी देखील वरील (१) व (२) नुसार कमाल वयोमर्यादेतील शिथिलता लागू राहील. त्यानुसार संबंधित

जाहिरातीच्या अनुषंगाने कमाल वयोमर्यादेत शिथिलता दिल्याने पात्र ठरलेल्या उमेदवारांना अर्ज सादर करण्यासाठी आवश्यकतेनुसार पुरेशी मुदतवाढ देण्यात यावी.

४) दि.३१ डिसेंबर, २०२३ नंतर प्रसिध्द होणाऱ्या जाहिरातींसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांकरीता संदर्भाधीन दि.२५.०४.२०१६ च्या शासन निर्णयात अथवा संबंधित पदांच्या सेवाप्रवेश नियमात विहित केलेली कमाल वयोमर्यादाच लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०३१८०२१४६५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B9450F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2023.03.03 18:06:26 +05'30'

**( गीता कुलकर्णी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (आपल्या विभागाच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय कार्यालयांना हा शासन निर्णय निदर्शनास आणावा.)
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
१०.निवड नस्ती.